राज्यात फिरते रुग्णालय सुरु करण्यास तत्वत:
मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः फिरतेरु- २०२४/प्र.क्र.८२ /आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :**

1. **सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये राज्यस्तर मुंबई यांचे पत्र क्रमांक : आसेआ/कक्ष-३ /Hospital on Wheels/Services,/७२०७-०९/२४, दिनांक १४.०३.२०२४.**

**प्रस्तावना :**

सद्य:स्थितीत महाराष्ट्रात शासन आपल्या दारी ही संकल्पना राबविण्यात येत आहे. त्यापुढे जाऊन "आरोग्य आपल्या दारी" ही संकल्पना राबविणे व त्याव्दारे नागरीकांचा आरोग्यावर होणारा खर्च कमीत कमी कसा होईल याकडे लक्ष देणे यासाठी "फिरते रुग्णालय" (Hospital On Wheels) हा प्रकल्प राबविण्याचे व त्याद्वारे आरोग्य आपल्या दारी या संकल्पनेमधून नागरीकांना गाव पातळीवर, घराजवळ अत्याधुनिक आरोग्य सेवा व सुविधा (रक्त तपासणी, एक्सरे, विविध प्रकारचे स्कॅन इ.) उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. ग्रामीण रुग्णालये, उप जिल्हा रुगणालये, जिल्हा रुग्णालये आरोग्य सेवा पुरवण्यासाठी असली तरीही या संकल्पनेमुळे नागरीकांना तपासण्या करण्यासाठी लांब जाण्याची गरज राहणार नाही. तसेच, दुर्गम व अति दुर्गम भागात विशेषत: ही सुविधा उपलब्ध करुन दिल्यामुळे समाजातील आरोग्याच्या सुविधेपासुन वंचीत असणाऱ्या लोकांना विशेष करुन महिला, वयोवृध्द नागरीक तसेच दिव्यांग व्यक्तीपर्यंत पोहोचणे शक्य होणार आहे. कोविड महामारीनंतर नवीन प्रकारचे येणारे संसर्गजन्य आजार यांची सुरुवातीला तपासणी करणे व प्रतिबंधात्मक उपाय योजना करणे या महत्वाकांक्षी प्रकल्पामुळे शक्य होणार आहे. यासाठी पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेली उद्दीष्टे साध्य करण्यासाठी प्रथमत: मुंबई शहर व मुंबई उपनगर हे दोन जिल्हे वगळता राज्यातील उर्वरित ३४ जिल्हयांमध्ये "फिरते रुग्णालय" (Hospital On Wheels) हा प्रकल्प राबविण्यास याद्वारे तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच खालील प्रमाणे कार्यवाहीस देखील मान्यता देण्यात येत आहे.

1. हा प्रकल्प आरोग्य सेवेशी संबंधित असल्यामुळे सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत व राज्य आरोग्य हमी सोसायटी (SHAS) मार्फत राबविण्यात यावा.

२) या योजनेसाठी लागणाऱ्या निधीचे वितरण मा. मुख्यमंत्री सहायता निधी न्यास(Trust) कडुन राज्य आरोग्य हमी सोसायटी (SHAS) कडे निधी वर्ग करण्यात यावे. यासाठी रु. ५०० ते ५५० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

३) सदर राज्य आरोग्य हमी सोसायटी (SHAS) मार्फत पुढील RFP प्रक्रिया करण्यात येईल.

४) सदर प्रकल्पासाठी Notice Inviting Tender प्रसिध्द करण्यात यावी व त्यामध्ये यासाठीची सविस्तर RFP दिनांक ३०.०३.२०२४ पर्यंत प्रसिध्द करण्यात येईल असेही नमूद करण्यात यावे.

५) सदर प्रकल्प राबविण्यासाठी सविस्तर धोरण ठरविणे, प्रकल्प सुरु करणे, प्रकल्पावर देखरेख ठेवणे आणि सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने व प्रकल्पाच्या परिणामाचे मुल्यमापन करण्यासाठी तसेच निविदा प्रसिध्द करण्यासाठी सविस्तर RFP तयार करण्याकरीता खालील प्रमाणे उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, मा. मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय. | अध्यक्ष |
| २ | सचिव (२) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय. | सदस्य |
| ३ | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ४ | संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | सचिव/ सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय. | सदस्य |
| ६ | आयुक्त, परिवहन, मुंबई | सदस्य |
| ७ | संचालक-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ८ | सह संचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर प्रकल्पासाठी धोरण ठरवितांना उपरोक्त समितीस काही तज्ञ व्यक्तींचा सल्ला घ्यावयाचा झाल्यास समिती तो घेऊ शकेल.

३. सदर प्रकल्प मुख्यमंत्री सहाय्यता निधीच्या, “सार्वजनिक आरोग्य विषयक पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व निर्मिती यासाठी मुख्यमंत्री सहायता निधी (कोविड -१९) तून अर्थ सहाय्य देणे” या उद्देशाखाली सदर निधीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७४४०२६८१७ असा आहे.

४. हा शासन निर्णय मा. मुख्य मंत्री यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVDAS MAHADEO DHULE

Digitally signed by SHIVDAS MAHADEO DHULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba459543ed19dc809f2f150cfde4470c9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55231903025208911890F58514593563E9788A66733F9A7E0D1A454083659841, cn=SHIVDAS MAHADEO DHULE
Date: 2024.03.15 23:04:42 +05'30'

**( शि. म. धुळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (सा.आ. व कु.क.),यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
६. अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).